पर्यटन धोरण-२०१६ अंतर्गत लॉजिंग हाऊसेस व खाद्यगृहे यासाठी लागणाऱ्या अनुज्ञप्त्यांबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक:- संकिर्ण-२०१७/प्र.क्र.१५६/नवि-२०**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक:- ०८ जून, २०१७.

वाचा :- शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. टिडीएस-२०१५/११/ प्र.क्र.१०२१/ पर्यटन, दिनांक ०४.०५.२०१६

**प्रस्तावना:-**

शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, दिनांक ०४.०५.२०१६ अन्वये राज्याचे पर्यटन धोरण निश्चित करण्यात आले असून, राज्यातील पर्यटन धोरणाला चालना मिळण्यासाठी नागरी स्थानिक संस्थांकडून लॉजिंग हाऊसेस् व खाद्यगृहे यासाठी लागणाऱ्या अनुज्ञाप्त्यांचे नुतनीकरण एक वर्षाऐवजी ५ वर्षे इतक्या कालावधीकरीता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक:-**

राज्यातील पर्यटन धोरणाला चालना मिळण्यासाठी नागरी स्थानिक संस्थांकडून लॉजिंग हाऊसेस् व खाद्यगृहे यासाठी महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती आणि औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ मधील तरतुदीनुसार देण्यात येणाऱ्या अनुज्ञप्त्यांचे नुतनीकरण ५ वर्षे इतक्या कालावधीकरीता करण्यात यावे.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०१७०६०८१७३९२३५३२५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fdbaa1d64146913669652db09801ad2747641d9f84fcf576e55f7050a8df530d, cn=Jayasingrao N Patil
Date: 2017.06.08 17:39:03 +05'30'

**( ज. ना. पाटील )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
२) सर्व सन्मानीय विधानसभा/ विधानपरिषद व संसद सदस्य
३) मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव
४) मा.मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव
५) सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

६) मा. राज्य निवडणूक आयोग यांचे कार्यालय
७) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
८) मा. लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय
९) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
१०) मुख्यमंत्री महोदय यांचे जनसंपर्क अधिकारी
११) राज्यातील सर्व महानगरपालिकांचे आयुक्त
१२) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
१३) उप सचिव, पर्यटन व सांस्कृतिक विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) राज्यातील सर्व नगरपरिषदा/ नगरपंचायती यांचे मुख्याधिकारी
१५) निवडनस्ती (नवि-२०).